राधागोविंद पुस्तकमाला.

पुस्तक १ लें.

# बालरामायण.



" म्हणे दास हें सार रामायणाचें "
" बहू अल्प सोपोंचि नाना गुणांचें "

—श्री समर्थ.

लेखक

वासुदेव गोविंद आपटे,

संपादक ' आनंद, ' पुणें.

१९२१.

किंमत चार आणे.

# अनुक्रमणिका.




| विषय. | | पृष्ठ. |
|---|---|---|
| | आरंभीं चार शब्द .... .... .... | १ |
| १ | आदिकांड अथवा बालकांड .... .... | २ |
| २ | अयोध्याकांड .... .... .... | १० |
| ३ | अरण्यकांड .... .... .... .... | २४ |
| ४ | किष्किंधाकांड .... .... .... | ३० |
| ५ | सुंदरकांड .... .... .... .... | ३५ |
| ६ | युद्धकांड .... .... .... .... | ३८ |
| ७ | उत्तरकांड .... .... .... .... | ४८ |
| | कोणापासून काय शिकावें? .... .... | ५४ |




# एकश्लोकी रामायण.

माझे मित्र रा. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनीं रामायणाचें सार पुढील एका श्लोकांत आणिलें आहे. मुलांनीं हा श्लोक पाठ करून ठेवावा.

## स्रग्धरावृत्त.

औधीं राम गेला वनीं
पुढति वधी कांचनाच्या मृगाला !
सीता नेली दशास्यें[1] पळवुनि
मृत्तिचा[2] योग गृध्रासि[3] आला ॥
वालीचा नाश झाला
उदधि[4] कपिवरीं[5] लंघिला, दाह[6] केला ।
लंकेचा, मारिला ही
दशमुखअनुजें[7] युक्त[8] ही रामलीला ॥

---

१ दश म्हणजे दहा आहेत आस्य ( तोंडें ) ज्याला असा ( रावण ) त्यानें; २ मृत्यु; ३ जटायु; ४ समुद्र; ५ वानरांत जे श्रेष्ठ त्यांनीं; ६ लंका जाळली; ७ धाकटा भाऊ ( कुंभकर्ण ) त्यासह; ८ योग्य.

# बालरामायण.

## आरंभीं चार शब्द.

मुलांनो, तुम्हांला रामायणांतील मुख्य गोष्ट थोडक्यांत सांगण्याचा माझा विचार आहे. परंतु त्यापूर्वीं रामायणाविषयीं दुसरी थोडीशी माहिती आरंभीं देतों, ती तुम्ही लक्षांत ठेवा. संस्कृत भाषेंत जे उत्तम उत्तम ग्रंथ आहेत, त्यांपैकीं रामायण हा एक ग्रंथ आहे. श्रीवाल्मीकि नांवाचा एक मोठा ऋषि होऊन गेला, त्यानें हा ग्रंथ रचिला. फार पूर्वींच्या काळीं आपल्या देशांत दशरथ नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न या नांवांचे चार मुलगे होते. हे सर्व शूर आणि चांगल्या वर्तनाचे होते. सर्वांत वडील राम हा होता. रामानें बापाच्या आज्ञेवरून चौदा वर्षें वनांत राहून रावण वगैरे राक्षसांना मारिलें आणि नंतर परत अयोध्येस म्हणजे आपल्या राजधानीस येऊन उत्तम प्रकारें राज्य करून प्रजेस सुखी केलें,

अशी कथा रामायणांत आहे. या रामायणग्रंथांतल्या प्रकरणास कांड म्हणतात. अशीं कांडें ७ आहेत. त्यांचीं नांवें:—१ आदिकांड अथवा बालकांड; २ अयोध्याकांड; ३ अरण्यकांड; ४ किष्किंधाकांड; ५ सुंदरकांड; ६ युद्धकांड; आणि ७ उत्तरकांड. या प्रत्येक कांडांतली कथा आतां क्रमानें सांगतों ती ऐका.

---

# १ बालकांड.

[ यांत रामाच्या बालपणची हकीकत सांगितली आहे, म्हणून या प्रकरणास 'बालकांड' म्हणतात. हें पहिलें कांड असल्यामुळें याला 'आदिकांड' असेंहि नांव आहे. ]

सरयू नदीचे कांठीं अयोध्या नांवाचें सुंदर शहर आहे. तेथें फार पूर्वींच्या काळीं इक्ष्वाकु नांवाचा एक प्रसिद्ध व थोर राजा होऊन गेला. त्याच्या कुळांतल्या सगळ्या राजांना इक्ष्वाकु वंशांतले राजे म्हणतात. या प्रसिद्ध इक्ष्वाकु वंशांत दिलीप, अज, दशरथ यांच्यासारखे मोठे पराक्रमी आणि प्रजेचें पालन उत्तम प्रकारें करणारे

अनेक राजे झाले. दशरथास सर्व गोष्टींची अनुकूलता होती. फक्त संतति नाहीं एवढेंच एक दुःख होतें. त्याला कौसल्या, कैकेयी आणि सुमित्रा अशा तीन राण्या होत्या. या राण्यांना मूलबाळ व्हावें म्हणून त्यानें परमेश्वराची पुष्कळ आराधना व यज्ञयाग केले. तेव्हां परमेश्वरकृपेनें कौसल्येस राम, कैकेयीला भरत आणि सुमित्रेला लक्ष्मण व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. या पुत्रजन्मामुळें दशरथ राजाला व त्याच्या प्रजेला फार आनंद झाला, व त्यांनीं त्याच्या जन्मदिवशीं मोठा उत्सव केला. रामाचा जन्म चैत्र शुद्ध नवमीला झाला, त्यावरून त्या दिवसाला रामनवमी म्हणण्याची चाल पडली आहे. लोक अजून दरवर्षी रावनवमीला रामजन्माचा उत्सव करीत असतात.

## शिक्षण.

मुलें हळूंहळू मोठीं झालीं व बोलूं आणि हिंडूं फिरूं लागलीं, तेव्हांपासून त्यांचें परस्परांवरचें प्रेम पाहून सर्वांस कौतुक वाटे. त्यांतल्या त्यांत लक्ष्मणाचें रामावर आणि शत्रुघ्नाचें भरतावर विशेष प्रेम होतें. सगळेजण एकत्र रहात, खात-

पीत आणि खेळत असत. हे सगळे मुलगे लहानपणापासून फार नम्र असून आईबापांच्या अगदीं आज्ञेत असत. हे पांच वर्षांचे झाले, तेव्हां वसिष्ठ ऋषींनीं त्यांना लिहिण्यावाचण्यास शिकविलें, आणि हळूंहळूं ते अनेक शास्त्रें शिकले. त्याचप्रमाणें रोज नेमानें व्यायाम करणें, घोड्यावर बसणें, नेम मारणें वगैरे गोष्टीहि गुरु त्यांचेकडून करवून घेत असत. याप्रमाणें, जसें बुद्धीला तसें शरीरालाही शिक्षण मिळाल्यामुळें हे राजपुत्र जसे हुषार व विद्वान झाले, तसेच धीट, शरिरानें मजबूत, आणि क्षत्रियांना अवश्य लागणाऱ्या युद्धकलेंतही ते लवकरच तयार झाले.

## विश्वामित्र येतात.

राजकुमारांनीं इतकी विद्या केलेली पाहून दशरथराजाला फार संतोष वाटला, आणि तो मुलांवर अधिक प्रेम करूं लागला. इतक्यांत एके दिवशीं विश्वामित्रऋषि एकाएकीं दशरथराजाकडे आले. राजानें त्यांचा योग्य मान करून त्यांना बसविलें आणि आपण हात जोडून " काय आज्ञा आहे ?" म्हणून त्यांचे पुढें नम्रपणें उभा राहिला. तेव्हां विश्वामित्र म्हणाले:— " हे राजा,

मी यज्ञाला आरंभ करतों; परंतु दुष्ट राक्षस त्यामध्यें विघ्नें आणून तो पूर्ण होऊं देत नाहींत. यज्ञयागाचें रक्षण करणें हा तुझ्यासारख्या क्षत्रियांचा धर्म आहे. यासाठीं त्यांच्या बंदोबस्ताकरितां युद्धविद्येंत निष्णात झालेल्या राम व लक्ष्मण या दोघां पुत्रांस तूं माझ्याबरोबर दे, येवढेंच तुझेजवळ मागणें आहे." हें ऐकून दशरथ राजा मोठ्या विचारांत पडला. तथापि गुरु वसिष्ठ यांच्या सांगण्यावरून त्यानें रामलक्ष्मणास पाठविण्याचें कबूल केलें. आज्ञेप्रमाणें रामलक्ष्मण धनुष्यबाण हातीं घेऊन आणि वडिलांना नमस्कार करून विश्वामित्राच्या मागून चालले.

## ताटकेला मारलें.

पुढें विश्वामित्रऋषि व मागून रामलक्ष्मण याप्रमाणें ते तिघेजण पर्वत व नद्या ओलांडून एका अरण्यांत येऊन पोहोंचले. याच अरण्यांत ताटका नांवाची राक्षसी रहात होती. ही मूळची यक्षिणी, जंभासुराचा पुत्र सुंद याची बायको होती. हिला मारीच नांवाचा एक पुत्र होता. तोही मोठा पराक्रमी पण क्रूर होता. ताटका व मारीच यांनीं गाईब्राह्मणांना मारावें व यज्ञयागादि कर्मांत

विघ्नें करावीं. रामलक्ष्मण व विश्वामित्र हे त्या अरण्यांत पोहोंचतांच त्यांनीं ताटकेची भयंकर आरोळी ऐकली. त्याबरोबर विश्वामित्रानें रामास तिला मारण्यास सांगितलें. परंतु ती स्त्री आहे आणि स्त्रीजातीवर हात टाकणें हें क्षत्रियधर्माचे विरुद्ध आहे, असें रामानें सांगितलें. तेव्हां विश्वामित्रानें त्यास समजावून सांगितलें कीं, क्रूरकर्म करणाऱ्या स्त्रीला शिक्षा करणें हा क्षत्रियांचा धर्मच आहे. इंद्रानें मंथरेचा व प्रत्यक्ष विष्णूनें भृगुऋषीची पत्नी व शुक्राचार्यांची माता हिचा वध केला होता. विश्वामित्राच्या सांगण्यावरून रामानें लागलीच तिला मारलें. याप्रमाणें ताटकेला मारल्यावर गौतममुनीची बायको अहिल्या त्यांच्या शापानें शिला होऊन पडली होती, तिला रामानें उठविलें, व नंतर ते तिघेजण सिद्धाश्रमांत ( विश्वामित्राच्या आश्रमांत ) गेले. तेथें गेल्यावर ऋषींनीं यज्ञ केला व राम आणि लक्ष्मण हे त्याच्या रक्षणाकरितां तयार राहिले. याप्रमाणें पांच दिवस झाल्यावर सहावे दिवशीं मारीच, सुबाहु वगैरे राक्षसांची धाड आली आणि ते राक्षस यज्ञाचा नाश करूं लागले. तेव्हां रामानें

बाणांची वृष्टि करून मारीचास पळवून लाविलें. सुबाहु जखमी होऊन पडला. आणखीहि पुष्कळ राक्षस मेले. याप्रमाणें रामाचे हातून ऋषींचीं संकटें दूर झालेलीं पाहून सर्वजण रामाची स्तुति करून त्यास आशीर्वाद देऊं लागले.

## सीतेचें लग्न.

दुसरे दिवशीं स्नानसंध्या आटोपल्यावर विश्वामित्रऋषि रामलक्ष्मणास म्हणाले, "मिथिला राजधानींत जनकराजाचे घरीं मोठा उत्सव होणार आहे. आम्हांस तेथें जावयाचें आहे. आमच्या बरोबर तुम्हीही चला. म्हणजे तेथें असलेलें विलक्षण शिवधनुष्यही तुमच्या पाहण्यांत येईल. तें देव, दैत्य व राक्षस यांपैकीं कोणासही पेलत नाहीं." 'आज्ञा' म्हणून रामलक्ष्मण त्याचेबरोबर जाण्यास निघाले.

विश्वामित्र पुष्कळ ऋषींना बरोबर घेऊन रामलक्ष्मणासह निघाले, ते तीर्थांचे ठिकाणीं मुक्काम करीत करीत जनकाच्या नगरींत येऊन पोंचले. त्यांच्या येण्याची खबर लागतांच जनक राजा आपला उपाध्याय शतानंद यासह त्यांस सामोरा गेला, व त्यानें सर्वांचें यथायोग्य स्वागत

केलें राम व लक्ष्मण यांचें अप्रतिम सुंदर रूप व तेज पाहून हीं कोणाचीं मुलें असें जनकानें विचारलें. तेव्हां हे दशरथाचे पुत्र आहेत व त्यांनीं अशा लहान वयांत राक्षसांना मारून माझ्या यज्ञाचें रक्षण केलें, वगैरे हकीकत विश्वामित्रानें सांगितली आणि आतां हे शिवधनुष्य पाहण्यासाठीं आले आहेत असें सुचविलें. याप्रमाणें बोलणें चालणें झाल्यावर विश्वामित्रास नमस्कार करून जनकराजा आपले मंदिरांत गेला.

दुसरे दिवशीं जनकराजानें सभेंत बसून तें शिवधनुष्य आणविलें आणि सर्वांचे समक्ष सांगितलें कीं, "शेत नांगरीत असतां नांगरानें जमिनीतून वर आलेली मुलगी मीं आपली म्हणून बाळगली आहे आणि तिचें नांव सीता असें ठेविलें आहे. ती लग्नाला योग्य झाली आहे व तिला मागण्यास पुष्कळ राजे आले आहेत. पण जो कोणी या धनुष्याला वांकवून त्यास दोरी लावील त्यालाच ही माझी कन्या मी देईन. आजपर्यंत पुष्कळांनीं प्रयत्न करून पाहिले, परंतु कोणासही तें अद्याप साधलें नाहीं." विश्वामित्रानें हें ऐकून रामाकडे पाहिलें आणि तें धनुष्य वांकविण्या-

विषयीं त्याला खूण केली त्याबरोबर रामानें उठून हजारों माणसांदेखत तें सहज गमतीनें उचलून दाखविलें व वांकविलें, तों इतक्यांत तें मध्यभागीं काडकन् मोडलें. रामचंद्राचें हें सामर्थ्य पाहून सगळी सभा आश्चर्यानें चकित झाली, आणि असा पराक्रमी, तेजस्वी आणि स्वरूपवान् जांवई मिळाल्यावर जनकालाही फार आनंद झाला. त्यानें विश्वामित्राच्या संमतीनें लागलीच दशरथराजास सर्व हकीकत कळवून त्यास पुत्राच्या विवाहाकरितां बोलावणें पाठविलें. जनकराजाचा निरोप ऐकून दशरथराजाला फार संतोष झाला व तो मोठ्या थाटामाटानें व ऐश्वर्यानें निघाला. जनकराजानेंहि त्याचा मोठा सत्कार करून रामाचें व सीतेचें लग्न मोठ्या थाटानें करून दिलें. जनकाला उर्मिळा नांवाची आणखी एक कन्या होती, ती त्यानें लक्ष्मणाला दिली. जनकराजाचा धाकटा भाऊ कुशध्वज याच्या दोन मुली मांडवी आणि श्रुतकीर्ति यांचींहि लग्नें अनुक्रमें भरत आणि शत्रुघ्न यांचेबरोबर झालीं.

लग्नसोहळा आटोपल्यावर दशरथराजा आपल्या चारी पुत्रांस व सुनांस घेऊन परत अयोध्येस जाण्यास निघाला. वाटेंत जमदग्नीचा पुत्र

परशुराम भेटला आणि रागानें डोळे लाल करून रामाजवळ जाऊन म्हणाला, "रामा, तूं शिवधनुष्य मोडलेंस, यामुळें तुझ्या पराक्रमाची मोठी कीर्ति झाली आहे. मीही एकवीस वेळां क्षत्रियांच्या नाश केला आहे. तेव्हां विष्णूपासून माझे हातीं आलेलें हें धनुष्य तूं वाकविशील, तर तुला खरा क्षत्रिय म्हणेन." तो असें बोलत आहे तोंच रामानें तें हातीं घेऊन तत्क्षणीं वाकविलें. तेव्हां परशुराम रामाची स्तुति करून निघून गेला. नंतर दशरथाची स्वारी मोठ्या थाटानें अयोध्येस जाऊन पोंचली व तेथें राजपुत्रांच्या लग्नानिमित्त मोठा आनंदोत्सव सुरू झाला. कांहीं दिवसांनीं भरत आपल्या आजोळीं नंदिग्राम येथें गेला, व त्याचे बरोबर शत्रुघ्नही गेला.

---

# २ अयोध्याकांड.

[ यांत राम लग्न करून आल्यापासून तों अरण्यांत जाईपर्यंत अयोध्येंत घडलेली हकीकत सांगितली आहे; म्हणून याला 'अयोध्याकांड असें नांव दिलें आहे. ]

राम आपल्या पराक्रमामुळें आणि गोड स्वभावामुळें सर्वांना अतिशय आवडत असे. तो सर्वांशीं नेहमीं गोड बोले. कधीं कोणाला कठोर

शब्दांनीं दुखवीत नसे; सर्वांशीं गरीबीनें वागे; त्याला थोडासुद्धां गर्व नसे; तो नेहमीं दुसऱ्यांस संतुष्ट ठेवी व आपण संतुष्ट राही; विद्याभ्यास मन लावून करी, व प्रकृति निरोगी ठेवण्यासाठीं नेमानें व्यायाम वगैरे करणें हा आपला धर्म आहे असें समजे. केव्हां कुठें काय बोलावें व कसें वागावें हें त्याला उत्तम कळत होतें. यामुळें लोकांना तो फार आवडता झाला आणि हाच आपणांस राजा असावा असें त्यांना वाटूं लागलें यांत नवल नाहीं. तशांत तो सर्वांत वडील मुलगा असल्यामुळें युवराजाचीं* वस्त्रें त्यालाच मिळावयाचीं होतीं म्हणून त्याला युवराज केलेला केव्हां पाहूं अशी साहजिकच लोकांना मोठी उत्कंठा वाटत होती. दशरथराजाला तर असें वाटत होतें कीं, आपल्या देखतच रामाला राज्यावर बसवून आपण राज्यकारभाराच्या दगदगींतून मोकळें होऊन तपश्चर्येला जावें. या गोष्टीस प्रधानांचा व प्रजेचा रुकार मिळाल्याबरोबर रामाला राज्याभिषेक करण्याचा विचार ठरला आणि त्यासाठीं तयारी करण्याविषयीं हुकूम सुटले.

---

* गादीवर असलेल्या राजाचे मागून जो गादीवर येणारा त्याला संस्कृत भाषेंत 'युवराज' म्हणतात.

## रामाला उपदेश.

सर्व तयारी झाल्यावर दशरथानें रामास बोलावून आणून आपल्या जवळ बसविलें आणि म्हटलें, " रामा, तूं सर्वांत वडील मुलगा आहेस आणि आपल्या गुणांनीं प्रजेला तूं संतुष्ट केलें आहेस. माझाही आतां वृद्धापकाळ झाला आहे. यासाठीं तुला मी पुष्यनक्षत्रावर राज्याभिषेक करणार आहें. तूं शहाणा आहेस. तुला सगळे समजतें, तथापि माया ही वेडी म्हणून मी तुला उपदेशाच्या चार गोष्टी सांगणार आहें. त्या तूं लक्षांत ठेव. राज्यकारभाराचें काम स्वतः पाहून आणि प्रजेच्या खऱ्या स्थितीची चांगली माहिती करून घेऊन तिचें न्यायानें पालन करणें हा मुख्य राजधर्म आहे. तसेंच सेनेची व्यवस्था चांगली ठेवून आणि दुष्टांस शिक्षा करून बंदोबस्त राखणें हेंहि राजाचें कर्तव्य आहे. दुसऱ्यास विनाकारण पीडा कधीं देऊं नये, शरण आलेल्याचें रक्षण करावें; राज्यांत आपापली कर्तव्यें योग्य रीतीनें करणारांस नेहमीं उत्तेजन देत रहावें; दुःखितांचें समाधान करून त्यांस आनंदवावें, दुसऱ्याची निंदा व स्वतःची स्तुति कधीं करूं नये; दुसऱ्याच्या

वस्तूविषयीं लोभ धरूं नये, कारण लोभ हा अनर्थांचें मूळ आहे; सर्व जीवांविषयीं पोटांत दया धरावी; सज्जनांचा आदर करावा; सारांश, प्रजेचें पुत्राप्रमाणें प्रेमानें पालन करावें व तिला सुख तेंच आपणांस सुख आणि तिला दुःख तेंच आपणांस दुःख असें समजून नेहमीं आपल्या कर्तव्यास जागावें. यांतच सगळें पुण्य आणि यांतच खरा पुरुषार्थ समजावा." बापाचें भाषण ऐकून आपली आज्ञा प्रमाण ' असें म्हणून रामानें दशरथास नमस्कार केला व आईकडे जाऊन तिला झालेली हकीकत कळविल्यावर, तिचे व तसेच आपल्या सावत्र मातांचे आशीर्वाद घेऊन, तो आपल्या मंदिरांत गेला.

## उत्सवांत विघ्न.

सकाळीं अयोध्येंत जिकडे तिकडे मंगल वाद्यें वाजूं लागलीं, आणि उत्सव सुरू झाले; नगरांतील लोक आनंदानें रामराज्याभिषेकाविषयींच्या गोष्टी बोलूं लागले; उत्तम रीतीनें पोषाख व अलंकार घातलेल्या स्त्रीपुरुषांचे थवेचे थवे रामदर्शनासाठीं उत्सुक होऊन खिडक्यांतून बसले व दूरचेही असंख्य लोक उत्सव पाहण्यास जमल्यामुळें या वेळीं

अयोध्या नगरी माणसांनीं फुललेली दिसूं लागली.

इकडे मंथरा नांवाची कैकेयीची आवडती दासी व दाई होती. तिला या उत्सवाचें कारण समजतांच तिच्या अंगाचा संताप झाला. ती कैकेयी निजली होती तिच्या जवळ जाऊन म्हणाली:—" कैकेयी, ऊठ. अग, अशी निजलीस काय? तुझें पुरतें वाटोळें होण्याची वेळ आली आहे तरी तुझे डोळे उघडत नाहींत, याला काय म्हणावें? रामाला राज्याभिषेक होणार आणि तूं तर स्वस्थ निजली आहेस! राजानें तुझ्याशीं कपटी वर्तन केलें आहे हें तुला कसें कळत नाहीं? अग, तुझ्या मुलाला राज्य मिळूं नये म्हणून तर त्याला आजोळीं पाठवून दिलें. कौसल्येचा मुलगा उद्यां गादीवर बसला म्हणजे तुला तिच्यापुढें बटकी-सारखें उभें रहावें लागेल, आणि तुझ्या मुलाला रामाची चाकरी करावी लागेल." मंथरेचें हें रागाचें बोलणें ऐकून घेऊन कैकेयी शांतपणानें म्हणाली:—" मंथरे, तुला आज झालें आहे तरी काय? मला जसा भरत तसाच रामही प्रिय आहे. शिवाय तो गुणवान्, आणि शुद्ध आचरणाचा आहे. त्याला राज्य मिळालें काय आणि भर-

ताला मिळालें काय सारखेंच." त्यावर मथरा जास्त संतापानें म्हणाली, "अग वेडे, पण पुढें तुझ्या मुलाचा राज्यावरचा हक्क नाहींसा होईलना? तुला आतां माझें बोलणें कडू लागत आहे. पण परिणामीं याचें फळ तुला मिळेल. रामाचे हातीं राज्य गेलें म्हणजे तो भरताला राज्यांतून घालवून देईल, वेळेस त्याचा घातही करील. लक्ष्मणावर त्याची प्रीति आहे आणि म्हणून त्याला फारसें भय नाहीं. पण भरताला आणि शत्रुघ्नाला अशा दोघांनाही फारच भय आहे. याकरितां रामाला वनवासास धाडण्याची आणि भरताला राज्य देण्याची कांहीं युक्ति काढली पाहिजे." हें ऐकून कैकेयीच्याही मनांत वाईट विचारानें पगडा बसविला, आणि तिला मंथरेचे शब्द खरे वाटूं लागले. तेव्हां मंथरेनें तिला एक उपाय सुचविला. तो असा. ती म्हणाली:—"पूर्वी वृषपर्व्याशीं युद्ध करीत असतां महाराज दशरथ घायाळ झाले होते. त्या वेळेस तूं त्यांच्या उपयोगीं पडल्यावरून त्यांनीं तुला दोन वर देऊं केले होते. ते मी वाटेल तेव्हां मागून घेईन असें तेव्हां तूं महाराजांना म्हणाली होतीस. ते वर

आतां मागून घे. एकानें रामाला चौदा वर्षें वनांत पाठीव व दुसऱ्यानें भरतासाठीं राज्य मागून घे." मंथरेचा हा उपदेश कैकेयीला पटला. तिनें अंगावरले दागदागिने चोहोंकडे अस्ताव्यस्त फेंकून दिले व केश मोकळे सोडून ती रागानें फणफणत बसली.

इकडे दशरथ राजा रामराज्याभिषेकाची सुवार्ता कळविण्याकरितां कैकेयीकडे गेला आणि पहातो तों ती रुसून बसलेली! तो प्रकार पाहून "तुला काय हवें आहे तें माग, तें देईन," असें राजानें म्हटलें. तेव्हां ती त्याच्याजवळून वचन घेऊन बोलली:—"महाराज, आपण चंद्र, सूर्य, व सगळे देव यांना साक्ष ठेवून मला मागें हवे त्या वेळीं दोन वर मागून घेण्यास सांगितलें आहे. ते वर मी आतां मागत्यें. तेवढे द्यावे. पहिला वर हा कीं, रामाला राज्याभिषेक न करतां भरताला तो करावा आणि दुसऱ्यानें रामाला चवदा वर्षें वनवासास पाठवावें."

कैकेयीचें हें कठोर भाषण ऐकून दशरथाला दुःखानें एकदम मूर्च्छा आली. तथापि कांहीं वेळानें सावध होऊन तो उठला आणि "दुसरें काय हवें



सुवर्णमृग.

तें माग, तें मी देईन, पण हा भलताच हट्ट धरूं नकोस," अशी हरप्रकारें तिची विनवणी करूं लागला. परंतु ती कांहीं केल्या ऐकेना. ती म्हणाली, "एकदां दिलेलें वचन खरें करण्यास एवढें तुमच्या जिवावर कां येतें? सत्य हाच माणसाचा मुख्य धर्म आहे. सत्यानेंच ईश्वराला संतोष होतो आणि म्हणून थोर लोक प्राण गेला तरी आपलें वचन मोडीत नाहींत. तुम्ही आपलें वचन खरें करीत नसाल, तर मी येथें तुमच्या देखत जीव देईन." हे कैकेयीचे शब्द दशरथाच्या मनाला फार लागले. त्यानें लागलेंच रामाला बोलावणें पाठविलें. रामानें येऊन दशरथ व कैकेयी या दोघांना नमस्कार करून हात जोडले आणि "काय आज्ञा आहे?" म्हणून विचारलें. दशरथाच्यानें बोलवेना. तो दुःखानें व्याकुळ झाला होता. आपल्या पित्याची अशी अवस्था कशानें झाली व एवढ्या दुःखाचें कारण काय असें रामानें कैकेयीस विचारलें. तिनें झालेली सगळी हकीकत रामास सांगितली. तेव्हां "वडिलांची आज्ञा मला मान्य आहे, मी हा आतां वनांत चाललों, तुम्हीच आतां माझ्या

मातापित्यांचें व भावांचें रक्षण करा," असें सांगून व नमस्कार करून राम निघाला. तो कौसल्येची आज्ञा विचारण्यासाठीं तिच्या मंदिरांत गेला. आपल्या मुलाला राज्याभिषेक झालेला आपण लवकरच पाहूं अशा आनंदाच्या भरांत ती होती. इतक्यांत रामानें येऊन वनांत जाण्याविषयीं आज्ञा विचारली. तेव्हां तिला दुःखानें मूर्च्छा आली. परंतु रामानें तिला सावध करून गोड शब्दांनीं तिचें समाधान केलें. लक्ष्मणही जवळच होता. आपल्या बापानें कांहीं एक विचार न करतां निरपराधी रामचंद्रास वनांत जाण्यास आज्ञा केली, या गोष्टीमुळें त्याच्या अंगाचा संताप झाला व तो त्या संतापाच्या भरांत प्रत्यक्ष बापाला शिक्षा करण्यास तयार झाला! पण रामचंद्रानें त्याला उपदेशाच्या चार गोष्टी सांगून ताळ्यावर आणिलें. वडिलांची आज्ञा पाळणें हा बालकांचा धर्म आहे; तसें ते न करतील तर त्यांचें कल्याण होणार नाहीं, हा रामचंद्राचा उपदेश त्याच्या मनावर ठसला. पुढें राम सीतेच्या मंदिरांत गेला. झालेली हकीकत ऐकतांच तीही शोकानें व्याकुळ झाली, आणि

तुम्ही वनांत जाण्यास निघालां, तर तुमच्याबरो-
बर मलाही घेऊन चला, असें म्हणाली. वनांत वाघ, सिंह वगैरे भयंकर पशु असतात, तेथें कंदमुळें व फळें खाऊन राहावें लागतें आणि अनेक प्रकारें कष्टानें दिवस काढावे लागतात; तूं आजपर्यंत सुखांत वाढली आहेस; तुझ्याच्यानें हे कष्ट कसे सहन करवतील? असें म्हणून अयोध्येंतच राहण्याविषयीं तिचें मन वळविण्याची रामानें पुष्कळ खटपट केली. पण जेथें पदार्थ तेथें त्याची सावली असते; तसें जेथें तुम्ही तेथें मी असेन, असा तिनें आग्रह धरल्यावरून तिला रामानें बरोबर घेतलें, आणि प्रेमाश्रूंनीं डोळे भरून येऊन तो लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, आतां तूंच सर्वांचें पालन कर. माझ्या जाण्यानें बाबा आणि माता कौसल्या हीं व्याकुळ झालीं आहेत, त्यांचें समाधान कर. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. ती ही कीं, राज्याविषयीं यत्किंचित्‌ही लोभ धरूं नकोस. जा, परमेश्वर तुला सद्बुद्धि देऊन तुझें कल्याण करील." पण लक्ष्मणानें आपणही त्यांचेबरोबर वनांत जाण्याचा आणि धनुष्यबाण घेऊन त्यांचें संरक्षण करणें, कंदमुळें वगैरे आणून

देणें, इत्यादि प्रकारची सेवा करण्याचा आपला निश्चय कळविला, तेव्हां निरुपायास्तव त्यालाही बरोबर घेण्याचें ठरलें.

## राम, लक्ष्मण व सीता वनास जातात.

राम, लक्ष्मण व सीता वनास जाण्यासाठीं निरोप घेण्याकरितां आलीं व राजास व राण्यांस नमस्कार करून आज्ञा मागूं लागलीं. तेव्हां राजा, राण्या व नोकरचाकर यांच्यामध्यें एकच आकांत झाला. त्यांना वनांत पोंचविण्यासाठीं दशरथाच्या आज्ञेवरून सुमंत सारथ्यानें रथ तयार करून आणिला आणि तीं तिघें त्या रथांत बसून अयोध्येंतून जाऊं लागलीं, तेव्हां प्रजा शोकानें व्याकुळ झाली. सारथी त्यांस तमसा नदीच्या तीरांवर सोडून, रथ घेऊन, माघारा अयोध्येस आला. तेव्हां आतां मला राम पुनः कशाचा दिसतो असें म्हणून आणि 'राम राम' असे शब्द तोंडानें उच्चारीत दशरथानें प्राण सोडला. मरतांना त्याला श्रावणवधामुळें मिळालेल्या शापाची आठवण झाली. (श्रावण शरयू नदीच्या तीरीं आश्रमामध्यें राहून आईबापांची सेवारूप तपश्चर्या करीत असे. एके दिवशीं मध्यरात्रीं

त्याच्या आईला फार तहान लागली, म्हणून पाणी आणण्यासाठीं तो नदीवर गेला. तो पाण्यानें भांडें भरूं लागला असतां बुडबुड असा आवाज ऐकून शिकारीकरितां गेलेल्या दशरथ राजानें तो आवाज हरणाचा समजून न पाहतां नुसत्या आवाजाचे धोरणावर बाण सोडला. तो श्रावणास लागून तो मेला. ही गोष्ट दशरथाच्याच तोंडून श्रावणाच्या वृद्ध मातापितरांस समजली, तेव्हां त्यांनीं त्याला शाप दिला कीं तूं आमचेसारखा पुत्रशोकानें मरशील; आणि हा शाप देऊन त्यांनीं प्राण सोडला.) दशरथ मरण पावला तेव्हां प्रधानानें भरताकडे त्वाईनें दूत पाठवून त्याला बोलावून आणिलें. अयोध्येला आल्यावर राम वनास गेल्याची व दशरथाचे मृत्यूस आपल्या आईचा हट्ट कारण झाल्याची एकंदर हकीकत भरतास समजली, तेव्हां तो दुःखानें फार कष्टी झाला आणि आईवर रागावून तिला कठोर शब्दांनीं खोचून बोलूं लागला. कैकेयीचे मनांत ही भलतीच गोष्ट भरविण्यास कारण मंथरा दासी झाली, ही गोष्ट ऐकतांच शत्रुघ्नाला मनस्वी राग आला आणि त्या रागाच्या झटक्यांत तिला पक-

डून ठार मारण्यासाठीं तो जाऊं लागला. पण भरतानें त्याचा राग शांत करून त्याला परत फिरविलें.

## भरतभेट.

राम, लक्ष्मण व सीता हीं फिरत फिरत गंगातीरीं आलीं. तेथें गुह नांवाच्या निषाद जातीच्या राजाचें राज्य होतें. त्याला राम आल्याची खबर कळतांच तो भेटावयास आला आणि त्यानें त्या तिघांचा उत्तम प्रकारें सत्कार केला. त्याच्या नावेंत बसून तीं गंगापार झालीं, आणि पुढें पायीं चालत प्रयागास भारद्वाज ऋषींच्या आश्रमांत येऊन पोंचलीं. तेथें आदर-सत्कार व ऋषींचे आशिर्वाद घेऊन पुढें चित्रकूटाला गेलीं. तेथें वाल्मीकि ऋषीचा आश्रम होता. त्याचे जवळच लक्ष्मणानें तिघांकरितां एक पर्णकुटी (झाडाच्या फांद्या व पानें यांची केलेली एक झोपडी) तयार केली व तींत तीं राहूं लागलीं. सीता झोपडींत बसली आहे व राम दारांत आणि लक्ष्मण बाहेर बसून सुखदु:खाच्या गोष्टी बोलत आहेत, इतक्यांत भरत व शत्रुघ्न यांनीं येऊन रामचंद्रास नमस्कार केला, आणि

बापाच्या मृत्यूची खबर सांगून कैकेयीच्या अपराधाची क्षमा करा, आम्हां दीनांकडे पहा, आणि परत अयोध्येस येऊन राज्य सांभाळा, अशी हात जोडून आणि मोठ्या दीनवाणीनें रामाची प्रार्थना केली दशरथाच्या मरणाची वार्ता ऐकतांच राम, लक्ष्मण व सीता यांनीं फार शोक केला, व मग वसिष्ठाच्या आज्ञेप्रमाणें फल्गु नदीच्या कांठीं श्राद्ध वगैरे क्रिया करून भरताला निरोप देतांना राम म्हणाला, "कैकेयीमातेनें कांहीं अपराध केला नाहीं. तिची व पित्याची आज्ञा मान्य करणें हा माझा धर्म आहे. राजाचें सिंहासन फार दिवस मोकळें राहूं नये. कारण, तसें झालें असतां शत्रूंना त्रास देण्यास फावतें. यासाठीं तूं लवकर परत जाऊन राज्यकारभार पाहूं लाग. राज्यावर तूं बसलास काय आणि मी बसलों काय सारखेंच आहे. चौदा वर्षांनीं आपल्या भेटी पुनः व्हावयाच्याच आहेत." एवढ्यानें भरताचें समाधान होईना, म्हणून शेवटीं त्याच्या आग्रहावरून रामानें आपल्या पादुका देऊन प्रेमानें त्यास निरोप दिला. भरत कष्टी होऊन अयोध्येस परत गेला आणि रामाच्या

पादुका सिंहासनावर ठेवून त्यांच्या नांवानें शत्रुघ्नास राज्यकारभार करावयास सांगून आपण नंदिग्रामीं रामाप्रमाणें जटावल्कलें धारण करून राहिला.

---

# ३ अरण्यकांड.

(राम, लक्ष्मण व सीता हीं अरण्यांत राहत होतीं, त्या वेळची हकीकत या कांडांत सांगितली आहे. म्हणून यास अरण्यकांड असें म्हटलें आहे.)

## लक्ष्मण शूर्पणखेचें नाक व कान कापतो.

भरत रामाच्या पादुका घेऊन परतल्यावर राम, लक्ष्मण व सीता हीं तिघें अत्रि ऋषीच्या आश्रमांत गेलीं. त्या ऋषीच्या बायकोनें त्यांचा आदरसत्कार करून सीतेला कांहीं अलंकार दिले. मग ऋषींचा आशिर्वाद घेऊन तीं निघालीं, आणि दंडकारण्यांतील पंचवटी नांवाच्या वनांत गोदावरीचे तीरीं एक पर्णकुटी बांधून राहिलीं. लक्ष्मणानें कंद, मुळें व फळें आणावीं, आणि रामानें झोपडींत राहून सीतेचें रक्षण करावें. याप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर एके दिवशीं

शूर्पणखा नांवाची राक्षसी त्यांचे जवळ आली आणि कांहीं फाजीलपणाचें वर्तन करूं लागली. त्यावरून रामचंद्राच्या आज्ञेनें लक्ष्मणानें एका बाणानें तिचें नाक व कान कापिले. ती ओरडत ओरडत आपले सोबती खर, दूषण वगैरे राक्षस यांच्याकडे जाऊन त्यांना झालेली हकीकत सांगूं लागली. तेव्हां आपली भयंकर राक्षससेना बरोबर घेऊन तेही रामचंद्रावर चाल करून गेले. परंतु रामचंद्रानें त्या सगळ्यांचा समाचार घेतला. त्रिशिरा, खर व दूषण यांच्यासारख्या भयंकर व पराक्रमी राक्षसांना रामासारख्या यःकश्चित् कोवळ्या पोरानें युद्धांत मारावें हा केवढा चमत्कार! असें आश्चर्य करीत व आपला भाऊ रावण याच्या हातून तरी आपल्या अपमानाचा सूड घेववावा असा विचार करीत शूर्पणखा लंकेस गेली. रावण महाराज राजसभेंत बसले होते. तेथें शूर्पणखा रडत रडत आपलें विद्रूप तोंड घेऊन गेली आणि म्हणाली:—" तुम्ही स्वस्थ काय बसलां आहां? तिकडे एका पोरानें काय अनर्थ मांडिला आहे तो पहा आणि त्याचा बंदोबस्त करा; नाहीं तर तुमचा सर्वस्वी नाश होईल.

त्यानें माझें नाक व कान कापून मला विद्रूप केलें आणि खर व दूषण यांच्यासारख्या बलाढ्य राक्षसांना एकट्यानें ठार केलें. त्याच्याबरोबर त्याचा एक भाऊ व त्याची बायको आहे. ती फारच सुंदर आहे. त्रैलोक्याचें राज्य करणाऱ्या तुलाच असलें रत्न योग्य आहे असें मला वाटतें."

## सीताहरण.

बहिणीची ती अवस्था पाहून आणि तिच्या तोंडची हकीकत ऐकून रावण संतापानें लाल झाला, व कांहीं तरी युक्ति करून रामाचा नाश लवकर केला पाहिजे असा विचार करून तो मारीच नांवाच्या राक्षसाकडे गेला, आणि कपटानें सीतेला फसवून घेऊन येण्याचें काम त्याला सांगूं लागला. पण मारीच म्हणाला, "छे, छे! हें काम फार वाईट आहे. तुम्हांला ही दुष्ट बुद्धि कोणीं दिली? असें केल्यानें कुंभकर्ण, बिभीषण वगैरे सगळ्या बंधूंसहित तुम्ही आपला सर्वस्वी नाश करून घ्याल." परंतु मरण जवळ आलेल्या रोग्याला जसें औषध घ्यावेसें वाटत नाहीं, तसा हा मारीच्याचा उपदेश रावणाला रुचला नाहीं. रावण कांहीं केल्या आपला आग्रह सोडीना. उलट

माझी आज्ञा मोडशील तर तुझें डोकें आतांच उडवीन असें तो म्हणाला. तेव्हां मारीच त्या गोष्टीस कबूल झाला. ते दोघे रथांत बसून दंडकारण्यांत गेले. तेथें सीता ज्या झोंपडींत होती तिच्या जवळपास मारीच कपटानें हरणाचें रूप घेऊन चरत फिरूं लागला. त्या हरणाचें शरीर सोन्यासारखें, शिंगें प्रवाळासारखीं, अंगावरले केस मोत्यासारखे आणि डोळे रत्नांसारखे पाहून त्याला धरून पाळण्याची सीतेला इच्छा झाली, आणि तिनें आपली इच्छा रामाला कळवून त्या हरणाला धरण्याविषयीं फार आग्रह धरला. तेव्हां लक्ष्मणाला सीतेच्या रक्षणासाठीं ठेवून राम त्या हरणाच्या मागें धावला. हरणानें हुलकावण्या दाखवीत रामाला पर्णकुटीपासून बरेंच दूर नेलें. शेवटीं रामानें मारीचाचें कपट ओळखून त्याला बाणानें मारिलें. मरतांना मारीच पूर्वीं ठरल्याप्रमाणें मोठ्यानें रामाच्या आवाजासारखा आवाज काढून 'हा सीते, हा लक्ष्मणा, धांवरे धांव, आणि माझें रक्षण कर,' असें ओरडला. तो आवाज ऐकून रामावर कांहीं संकट गुदरलें आहे असें समजून सीतेनें लक्ष्म-

णाला त्याच्या मदतीस जाण्यास सांगितलें. 'हा रामाचा आवाज नव्हे, रामाला कोणापासूनही भीति नाहीं,' असें लक्ष्मणानें तिला पुष्कळ प्रकारें सांगितलें; परंतु ती ऐकेना. ती त्याला वाईट शब्दानें बोलली. तेव्हां तो निरुपाय होऊन निघून गेला. ही संधी साधून रावण यतिवेषानें भिक्षा मागण्यासाठीं झोपडीपाशीं आला आणि सीतेला रथांत घालून लंकेला जाऊं लागला. तेव्हां ती मोठ्यानें ओरडून रामलक्ष्मणांला हाका मारूं लागली.

## जटायूची भेट.

गरुडाचा मुलगा जटायु यानें तिचें तें ओरडणें ऐकून तिला सोडून देण्याविषयीं रावणाला पुष्कळ सांगून पाहिलें, पण तो ऐकेना. तेव्हां त्यानें रागानें रावणाच्या रथावर उडी मारून त्या रथाच्या ध्वजाचा नाश केला, सारथ्याला मारलें, आणि रावणाच्या पाठीचें मांसही तोडलें. पण रावणासारखा पराक्रमी त्रिभुवनांत कोणी नव्हता. तो त्या पक्ष्यास काय जुमानतो? त्यानें लागलीच एका बाणानें जटायूचे दोन्ही पंख तोडून टाकिले. पंख तुटल्यामुळें तो अगदीं निर्बल

होऊन पडला, आणि रावण त्याच्या देखत सीतेला खांद्यावर घेऊन निघून गेला. इकडे राम मारीचाला मारून परत येत असतां वाटेंत त्याला लक्ष्मण भेटला. सीतेला एकटी टाकून तूं कां आलास? असें रामानें त्यास विचारलें. तेव्हां लक्ष्मणानें झालेली हकीकत सांगितली. बोलत बोलत ते दोघे भाऊ झोपडीपाशीं आले आणि पाहतात तों सीता कोठें दिसेना. तेव्हां राम मोठ्या काळजींत पडला आणि तिची आठवण करून दुःखानें रडूं लागला. सीतेच्या दुःखानें अगदीं वेडा होऊन तो झाडाखालीं, गुहेंत, डोंगरांत नदीच्या तीरावर, प्रत्येक ठिकाणीं सीता आहे काय म्हणून पाही आणि ती सांपडली नाहीं म्हणजे रडूं लागे. याप्रमाणें शोक करतां करतां, पंख तोडल्यामुळें रक्तबंबाळ होऊन विव्हळत पडलेला जटायु जेथें होता तेथें, रामलक्ष्मण येऊन पोंचले. सीतेला बळजबरीनें रथांत घालून लंकेंत घेऊन जातांना रावणाला आपण पाहिलें आणि सोडवायला गेलों तर रावणानें आपली ही अवस्था केली वगैरे हकीकत जटायूनें सांगितली. आणि 'रामा, तुझ्या दर्शनाकरितां मीं अद्याप

जीव ठेविला होता, तें दर्शन झालें, आतां मी सुखानें मरतों,' असें म्हणून त्यानें प्राण सोडला. सीतेकरितां यानें आपला जीवसुद्धां खर्ची घातला हें पाहून रामाच्या प्रेमाला भरतें आलें आणि जसा कांहीं आपला जवळचा आप्त मेला असें वाटून जटायूच्या मरणाबद्दल त्यानें फार शोक केला. तथापि कांहीं वेळानें मनाचें समाधान करून व जटायूचें दहन वगैरे करून तो पुढें सीतेच्या शोधाकरितां निघाला.

---

# ४ किष्किंधाकांड.

---:०:---

[किष्किंधा नगरींतील हकीकत या कांडांत आहे, म्हणून यास 'किष्किंधाकांड' असें नांव दिलें आहे.]

## सुग्रीवाशीं सख्य.

सीतेला घेऊन रावण दक्षिणेस लंकेला गेला ही गोष्ट जटायूच्या तोंडून ऐकल्यापासून तिला परत कसें आणतां येईल हा विचार राम व लक्ष्मण यांच्या डोक्यांत घोळूं लागला. रामाला आपली खूण पाहून माग काढतां यावा म्हणून

सीतेनें जातां जातां आपल्या अंगावरचे दागिने आणि वस्त्र रस्त्यांत फेंकून दिलें होतें. त्या खुणे-च्या धोरणानें राम व लक्ष्मण तिचा शोध करीत चालले होते. जातां जातां ते ऋष्यमूक पर्वता-पाशीं पंपा नांवाचें सरोवर आहे, त्याच्याजवळ किष्किंधा नांवाच्या राज्यांत जाऊन पोंचले. तेथें वाली नांवाचा राजा राज्य करीत होता, त्याला सुग्रीव हा एक भाऊ होता. पण त्या उभयतांचें हाडवैर होतें. मारुतीच्या मध्यस्थीनें सुग्रीवाची व रामलक्ष्मणांची गांठ पडून ते जिवलग मित्र झाले व राम आणि सुग्रीव यांच्यामध्यें असें ठरलें कीं रामानें वालीला मारून त्याचें राज्य सुग्रीवाला द्यावें व सुग्रीवानें त्याबद्दल सीतेचा शोध करण्याचे कामीं रामाला लागेल ती मदत करावी.

सुग्रीव व वाली यांच्यामधील भांडणाची मूळ कथा अशी आहे:—बापाच्या मरणानंतर वाली हा वडील मुलगा म्हणून तो गादीवर बसला. पुढें मायावी नांवाच्या असुराचें व वालीचें भांडण लागलें. वाली व सुग्रीव हे दोघेही त्या असुराशीं युद्ध करीत असतां तो पळाला आणि एका गुहेंत शिरला. वाली सुग्रीवाला त्या गुहेच्या तोंडाशीं

उभें राहण्यास सांगून आपण त्या असुराच्या मागोमाग गुहेंत शिरला. सुग्रीवानें एक वर्षभर त्याची वाट पाहिली; पण तो परत येईना; आणि त्या गुहेंत रक्त सांडलेलें दिसलें, तेव्हां आपला भाऊ खास मारला गेला असें समजून त्या गुहेच्या तोंडाला एका भल्या जंगी दगडाचें झांकण बसवून सुग्रीव किष्किंधेला परत गेला आणि भावाच्या गादीवर बसून स्वतःच्या नांवानें राज्य करूं लागला. इकडे वाली त्या असुराला मारून परत गुहेच्या तोंडाशीं येऊन पहातो तों तें बंद! तेव्हां त्याला सुग्रीवाचा फार राग आला. त्यानें युक्तीनें बाहेर येऊन सुग्रीवाला राज्यांतून घालवून दिलें, व त्याच्या बायकोला आपल्या ताब्यांत ठेविलें. तेव्हांपासून सुग्रीव भटकत फिरत होता. रामलक्ष्मणास पाहून त्यांच्या साह्यानें वालीस मारण्याचा व आपली बायको व राज्य परत मिळविण्याचा त्यानें विचार केला व त्यासाठीं त्यानें रामाशीं मैत्री केली.

## वालीचा वध.

लवकरच सुग्रीवाचें व वालीचें युद्ध झालें. त्यांस रामानें एका झाडामागें उभे राहून वालीच्या

अंगावर बाण सोडला. तो बाण छातींत लागून वाली पडला. हें पाहून, व्याध जसा आपण मारलेल्या हरणापाशीं जातो तसा, राम त्याच्यापाशीं गेला. रामाला पाहून मरतां मरतां वाली म्हणाला:— "अरे, राजकुलांत जन्मलास, पण राजाचा धर्म तुला अद्याप कळत नाहीं! मीं तुझा असा कोणता अपराध केला होता कीं त्याबद्दल तूं मला ही मरणाची शिक्षा दिलीस? आम्हां दोघां भावांच्या भांडणांत तुला पडण्याचें कारण काय होतें?" यावर रामानें उत्तर केलें, "पापी लोकांचा भार या पृथ्वीला फार झालेला आहे. दुष्टांना शासन करून तो हलका करणें आणि कोणीं अपराध केला तर त्याला त्याच्या अपराधाबद्दल शिक्षा करणें हा माझा धर्म आहे. तूं सुग्रीवाची बायको आपल्या ताब्यांत ठेविलीस. या तुझ्या अपराधाबद्दल तुला ही शिक्षा केली आहे." आपल्या अपराधाचें स्मरण होतांच वालीला फार खेद झाला आणि त्यानें आपला मुलगा अंगद याला सुग्रीवाचे पायांवर घालून, आतां तूंच याला बापाचे जागीं हो आणि पुत्राप्रमाणें याचें पालन कर, असें म्हटलें व याला बापा-

प्रमाणें समजून मान देत जा व त्याच्या आज्ञेंत राहा, असें अंगदाला सांगून त्यानें प्राण सोडला.

## सीतेचा शोध.

कबूल केल्याप्रमाणें वालीला मारून रामानें सुग्रीवाला राज्य दिलें. तेव्हां त्यानेंही सीतेचे शोधासाठीं चारी दिशा हनुमान् (याचें नांव मारुती असेंही होतें) नल, नील वगैरे वानर पाठविले. शोध करून एक महिन्याच्या आंत परत यावें असा सर्वांना हुकूम होता. या वानरांत हनुमान् मुख्य होता. म्हणून रामानें त्याला बोलावून त्याचे जवळ आपली हातांतली अंगठी सीतेला ओळख पटण्याकरितां खूण म्हणून दिली. ती अंगठी घेऊन हनुमान्, अंगद वगैरे वानर दक्षिण दिशेला गेले. बाकींचे वानर जे निरनिराळ्या दिशांना गेले होते ते एका महिन्यांत निराश होऊन परत आले; परंतु हे परत आले नाहींत. सीतेचा शोध लागल्याशिवाय रामाला तोंड दाखवावयाचें नाहीं अशा निश्चयानें हे गेले होते. अखेरीस एकदां जटायूचा भाऊ संपाति याची व त्याची दक्षिण समुद्रापाशीं गांठ पडली. रावणानें सीतेला समुद्रपार लंका बेटांत नेऊन

ठेविले आहे, असें त्यानें सांगितलें. तेव्हां सीतेच्या शोधासाठीं लंकेस जाण्याचा त्यांचा विचार ठरला. पण ह्या एवढा समुद्र ओलांडण्याचें सामर्थ्य एकट्या हनुमानाचेच अंगीं होतें म्हणून आपल्या सोबत्यांस समुद्रकांठीं बसवून तो एकटा लंकेस गेला. तेथें पुष्कळ शोध केल्यावर अशोकवनांत एका झाडाखालीं सीता त्याला दिसली.

---

# ५ सुंदरकांड.

—:०:—

[ या कांडांत हनुमान् आणि सीता यांच्या लंकेंत झालेल्या पहिल्या भेटीची सुंदर हकीकत आहे, म्हणून त्याला 'सुंदरकांड' नांव आहे. ]

## मारुती लंका जाळतो.

सीतेनें आपल्या मनाप्रमाणें वागण्यास कबूल व्हावें म्हणून रावणानें तिची पुष्कळ मनधरणी केली; पण ती ऐकेना. तेव्हां तिला राक्षसींच्या पाहऱ्यांत ठेविलें व तिचे हाल केले. तरीही ती ऐकेना. तेव्हां एक वर्षाची मुदत दिली आणि या मुदतींत ती कबूल न झाली तर तिला मार-

ण्याचा धाक घातला. या मुदतीपैकीं दोनच महिने आतां बाकी राहिले होते. सीता रामाचें वारंवार स्मरण करून दुःख करीत होती. तिला अन्नपाणी गोड लागेना. अशा स्थितींत एकाएकीं हनुमानानें येऊन रामानें दिलेली खुणेची अंगठी दाखवून राम व लक्ष्मण सुखरूप आहेत व ते लवकरच तुझी सुटका करून तुला घेऊन जातील, असा तिला धीर दिला. तेव्हां तिला जो आनंद झाला त्याचें वर्णन काय करावें! लवकर परत जाऊन रामलक्ष्मणांना घेऊन ये असें सांगून तिनें हनुमानास निरोप दिला. त्यानें जातां जातां अशोकवनांतलीं झाडें उपटून टाकलीं आणि सुंदर सुंदर वाड्यांचा नाश केला. ही बातमी राक्षसांना कळतांच ते धावून आले. पण त्यांनाही त्यानें मारलें. मग रावणानें आपले पुत्र अक्ष व इंद्रजित् यांना पाठविलें. पैकीं अक्षाला तर त्यानें लोळविलें. इंद्रजिताच्या मात्र हातीं तो आपण होऊन लागला. तेव्हां राक्षसांनीं हातपाय बांधून त्याला रावणापाशीं नेलें. त्याला ठार मारण्याविषयीं रावणानें हुकूम केला. पण रावणाचा भाऊ बिभीषण हा मध्यें पडून म्हणाला कीं, हा

रामाकडून वकील म्हणून आलेला आहे आणि शत्रूकडील वकिलाला ठार मारणें हें क्षत्रियांच्या धर्माविरुद्ध आहे. ही गोष्ट रावणाला पटली; पण मारुतीनें पुष्कळ नासाडी केली होती, म्हणून त्याला जिवें न मारतां त्याच्या शेंपटीला चिंध्या गुंडाळून व तेल ओतून तीं पेटवून द्यावी, असा त्यानें हुकूम केला. त्याप्रमाणें करतांच हनुमान् उडाला व या घरावर बैस त्या घरावर उडी मार, असें करीत करीत सगळ्या लंकेला आग लावून दिल्यावर समुद्र ओलांडून, अंगद वगैरे वानर बसले होते त्या ठिकाणीं, तो परत आला. नंतर ते सर्व रामचंद्रापाशीं गेले. मारुतीनें सीते-जवळून खूण म्हणून तिच्या वेणींतला दिव्य मणी आणिला होता, तो रामचंद्रास दिला व झालेली हकीकत त्याला सांगितली. तेव्हा रामाला फार आनंद झाला व त्यानें मोठ्या प्रेमानें मारुतीला पोटाशीं धरलें.



# ६ युद्धकांड.

[ रावणाशीं युद्ध करून त्याला रामानें मारल्याची कथा या कांडांत सांगितली आहे, म्हणून यास 'युद्धकांड' असें नांव दिलें आहे. ]

हनुमानानें सांगितलेली हकीकत ऐकून सीतेची सुटका करण्यासाठीं राम, लक्ष्मण आणि सुग्रीव वानरसैन्य घेऊन समुद्रतीरापाशीं तर येऊन पोहोंचले. पण समुद्र कसा ओलांडावा ही त्यांना मोठी अडचण येऊन पडली.

## बिभीषणाशीं मैत्री.

इकडे रावणानेंही युद्धाची तयारी केली. राम हा यःकश्चित् मनुष्य आणि त्यांतूनही पोरवय! त्याला काय आपण सहज जिंकूं, अशा घमेंडींत तो होता. पण बिभीषणाला मात्र तसें वाटत नव्हतें. बिभीषण फार पवित्र मनाचा, शुद्ध वर्तनाचा आणि चांगल्या स्वभावाचा होता. सीतेला परत रामचंद्राकडे पोहोंचवून द्यावी असें त्यानें रावणाला अनेक वेळां जीव तोडून सांगितलें. पण त्या बिचाऱ्याचें कोण ऐकतो? शेवटीं ज्याचें कर्म त्याचेपाशीं, असें म्हणून तो

रावणाचा पक्ष सोडून रामचंद्राकडे आला. पण सुग्रीवाला त्याचा विश्वास येईना. रावणानेंच त्याला कपटबुद्धीनें पाठविलें असेल अशी त्यानें शंका घेतली. परंतु रामचंद्र हा उदार मनाचा होता. कोणी कशाही बुद्धीनें येवो, जे आपला आश्रय करतील त्यांच्यावर दया करावयाची, प्रत्यक्ष शत्रु जरी आश्रय मागूं लागला तरी तो त्याला द्यावयाचा, असा त्याचा फार उदार स्वभाव होता. म्हणून त्यानें बिभीषणाचा सत्कार करून त्याला आपलेपाशीं ठेवून घेतलें, आणि लंकेचें राज्य त्याला देण्याचें कबूल केलें.

वर सांगितल्याप्रमाणें समुद्र ओलांडावा कसा अशी अडचण येऊन पडली, तेव्हां बिभीषणाची सल्ला वानरांच्या उपयोगीं पडली. त्यानें सांगितल्याप्रमाणें विश्वकर्म्याचा मुलगा नल यानें समुद्रावर पूल बांधून दिल्यावर सगळ्या वानरसेनेसह रामचंद्र समुद्राच्या पार सुवेलाचल नांवाच्या पर्वतावर येऊन उतरले.

वानरसैन्य उतरल्याची खबर लागतांच रावणानें शुक आणि सारण या दोघां दूतांस शत्रूच्या सैन्याची माहिती आणण्यासाठीं पाठविलें.

त्यांनीं जाऊन सांगितलें कीं, वानरसैन्य फार मोठें आहे, आणि त्यांच्याशीं लढून युद्धांत आपणांस जय मिळेलच असा भरंवसा नाहीं. याकरितां सीतेची सुटका करून रामचंद्राशीं स्नेह करावा हें चांगलें. रावणाची बायको मंदोदरी हिनेंही अशीच सल्ला दिली. परंतु रावण कोणाचाही चांगला उपदेश या वेळीं ऐकेना. त्यानें सीतेला त्रास देण्यासाठीं रामाच्या डोक्यासारखें एक खोटेंच डोकें आणि धनुष्यासारखें धनुष्य आणवून तें सीतेकडे पाठविलें आणि आम्हीं रामाला युद्धांत मारलें आहे, आतां तरी आमच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास कबूल हो, असें तिला म्हटलें. परंतु ती अशा युक्तीनें फसणारी आणि वाईट मार्गानें चालून आपल्या कुलशीलाला कलंक लावणारी स्त्री नव्हती. ती आपल्या निश्चयापासून ढळली नाहीं. ती फारच शोक करूं लागली, तेव्हां बिभीषणाची बायको सरमा हिनें हें सर्व कपट आहे व रामलक्ष्मण सुखरूप आहेत, असा तिला धीर दिल्यावर ती स्वस्थ झाली. तेव्हां रावणाचा निरुपाय झाला, आणि आपल्या सैन्याची व्यवस्था लावून तो शत्रूला तोंड देण्यास उभा राहिला.

## युद्धास आरंभ.

लढाई न करतां गोडीगुलाबीनें काम झालें तर पहावें म्हणून यत्न करण्याकरितां रामचंद्रानें अंगदास रावणाकडे पाठविलें; पण त्याच्या जाण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट राक्षसांनीं त्याला मारण्याचा विचार केला. पण तो त्यांचे हातून निसटला आणि आपली वानर-सेना घेऊन जाऊन रावणाच्या सैन्यावर तुटून पडला. येथें युद्धास आरंभ झाला. रावणाचा पुत्र इंद्रजित् यानें या युद्धांत मोठा पराक्रम केला. त्यानें राम व लक्ष्मण या दोघांनाही बेशुद्ध करून खालीं पाडलें आणि जांबवान्, हनुमान् आणि अंगद वगैरे वानरवीरांना जखमी केलें. रामलक्ष्मण जमिनीवर पडलेले पाहून ते मेले अशा समजुतीनें युद्ध आटोपून इंद्रजित् परत आपल्या राजधानींत मोठ्या थाटानें आणि आनंदानें गेला. शत्रूला मारल्याची खबर कळतांच रावणाला आनंद झाला, व त्या आनंदाच्या भरांत त्यानें सीतेला पुष्पक विमानांत बसवून रामलक्ष्मण मरून पडलेले तिला वरून दाखविलें. सीतेनें त्यांची ती स्थिति पाहतांच शोक करण्यास प्रारंभ केला.

पण रामलक्ष्मण हे ज़िवंत आहेत, ते मरण पावले नसून नुसते बेशुद्ध होऊन पडले आहेत असें कळल्यावर तिनें आपला शोक आवरिला.

इकडे रामलक्ष्मण हळूं हळूं शुद्धीवर आले व उठून पुनः युद्धास उभे राहिले. हें ऐकतांच रावण चिंतेंत पडला. त्यानें धूम्राक्ष, वज्रदंष्ट्र, अकंपन व प्रहस्त असे चार महान् महान् वीर पाठविले; पण वानरांनीं त्या सर्वांना मारिलें. तेव्हां इंद्रजित्, निकुंभ आणि दुसरे कित्येक वीर यांना घेऊन स्वतः रावण युद्धासाठीं आला व त्यानें मोठ्या आवेशानें लढून सुग्रीवाला बेशुद्ध केलें, हनुमानाला जर्जर केलें, आणि नलाला अर्धमेला करून जमिनीवर पाडलें. हा बिकट प्रसंग पाहून लक्ष्मण रावणाशीं युद्ध करूं लागला. परंतु त्यालाही रावणानें एका दिव्य शक्तीनें जखमी करून पकडलें आणि तो त्याला आपल्या बरोबर घेऊन जाणार, इतक्यांत हनुमानानें त्याला एक जोराचा तडाखा दिला व लक्ष्मणाला त्याचे हातून सोडवून तो गर्दींतून निघून गेला. इकडे राम आणि रावण यांचें युद्ध लागलें. त्यांत रामानें बाणांची वृष्टि करून रावणाच्या रथाचे घोडे मारले,

सारथ्यास जखमी केलें, आणि रथाचा नाश केला. इतकेंच नाहीं, तर रावणाच्या छातींत एक बाण मारून त्यालाही चीत केलें, पण ठार मारलें नाहीं. असा अपजय घेऊन लंकेंत गेल्यावर रावणानें कुंभकर्णास बोलावूं पाठविलें.

## कुंभकर्ण मरतो.

रावणाचा भाऊ कुंभकर्ण हा अतिशय झोपाळू असे. त्याला या वेळीं इतकी झोप लागली होती कीं, लंकेंत येवढा अनर्थ गुदरला तरी त्याला त्याची खबरही नव्हती! त्याच्या कानांशीं राक्षसांनीं मोठमोठाले नगारे आणि भयसूचक वाद्यें वाजविलीं, तेव्हां स्वारीनें हळूच डोळे उघडले, आणि उठल्याबरोबर अगोदर खाण्यासाठीं आणिलेले पदार्थ गट्ट करून मग हा काय प्रकार आहे? म्हणून चौकशी केली. नंतर सगळी हकीकत ऐकून घेऊन तो रावणाकडे गेला, आणि सीतेला आणून विनाकारण स्वतःवर अनर्थाचा प्रसंग ओढवून घेतला असें बोलून व आतां झालें तें झालें असें म्हणून त्यानें अंगांत चिलखत घातलें आणि हातांत शस्त्र घेऊन वानर—सेनेवर आवेशानें चाल केली. त्यानें

अंगद् व हनुमान् यांना जखमी केलें आणि सुग्रीवाला पकडून तो लंकेंत जाऊं लागला. पण सुग्रीवानें मोठ्या युक्तीनें आपली सुटका करून घेतली. तथापि जातां जातां त्यानें कुंभकर्णाचें नाक आणि कान तोडले. त्यामुळें कुंभकर्ण चवताळून पुनः युद्धाला आला. त्याचें अगोदर लक्ष्मणाशीं व मग रामाशीं मोठें युद्ध झालें. त्यांत कुंभकर्ण मारला गेला. त्याचे मागून महोदर, नरांतक व रावणाचा पुत्र अतिकाय या राक्षसांनाही लक्ष्मणानें मारिलें.

## लक्ष्मण इंद्रजिताला मारतो.

रावणाकडचे मोठमोठे वीर मारले गेले हें ऐकून इंद्रजिताला त्वेष चढला, आणि त्यानें सुग्रीव, अंगद् व जांबवान् यांना बेशुद्ध केलें. हा त्याचा पराक्रम पाहून आणि विशेषतः इंद्रजित् अदृश्य राहून लढत होता म्हणून रामलक्ष्मणांनीं आपणही बेशुद्ध होऊन पडल्याचें सोंग केलें. तेव्हां रामाकडले सगळे वीर मारले गेले, असें समजून तो निघून गेला. इकडे हनुमान् आणि बिभीषण हे आपल्याकडले कोण कोण वीर जिवंत आहेत हें पाहण्यासाठीं आले.

त्यांनीं जांबवान् जखम लागून पडला आहे असें पाहिलें. तेव्हां त्याची ती जखम बरी करण्यासाठीं हनुमान् वनस्पति आणण्याकरितां क्षीरसागरामध्यें असलेल्या महोदर पर्वतावर गेला. तेथें पुष्कळ वनस्पतींचीं दाट वनें होतीं. त्यांतली कोणती वनस्पती पाहिजे तें कळेना, म्हणून तो पर्वताचें शिखर सबंध उपटून घेऊन आला व पाहिजे होत्या त्या वनस्पती काढून घेऊन पुनः त्यानें तें शिखर जागचे जागीं नेऊन ठेविलें. याप्रमाणें वानरसैन्य पुनः हुशार झाल्यावर हनुमानानें लंकेवर हल्ला केला. तेव्हां इंद्रजितानें त्याचा नाश करण्यासाठीं विजयरथ मिळविण्याकरितां होम करण्यास सुरुवात केली. हा होम पुरा झाला असता, तर इंद्राजित् कोणाच्यानेंही जिंकला गेला नसता. म्हणून बिभीषणानें रामाकडून त्या होमाला विघ्न करण्यासाठीं लक्ष्मणाला पाठविलें. लक्ष्मणानें हनुमानाच्या ( मारुतीच्या ) खांद्यावर बसून जाऊन इंद्रजिताच्या होमाला विघ्न केलें. त्यामुळें चवताळून तो लक्ष्मणाचे अंगावर धावला. दोघांचेंही भयंकर युद्ध झालें. शेवटीं लक्ष्मणानें त्याला लढाईत मारलें.

## रावणवध.

मेघनाद (हें इंद्रजिताचें दुसरें नांव होतें) मारला गेला, हें ऐकतांच रावण दुःखानें व्याकुळ झाला व ज्यांनीं आपल्या एवढ्या पराक्रमी वीरांना, बलवान् बंधूला, व पुत्रांना मारिलें, त्याचा सर्वस्वीं नाश केल्यावांचून परत लंकेला तोंड दाखवावयाचें नाहीं, असा निश्चय करून तो फार मोठें सैन्य घेऊन निघाला. रामाला पाहतांच तो दांतओठ चावूं लागला आणि अशी भयंकर बाणांची वृष्टि करूं लागला कीं ती पाहून पुष्कळ वानर भिऊन गेले. या झटापटींत लक्ष्मणाला एक शक्ति लागून तो बेशुद्ध होऊन खालीं पडला; परंतु सुषेणाच्या सांगण्यावरून महोदरपर्वतावरली एक वनस्पती आणवून ती हुंगावयास देतांच पुनः सावध झाला. राम आणि रावण यांचें हें युद्ध फारच भयंकर झालें. सात दिवसपर्यंत बाणांनीं आकाश धुंद झालें. दोन्ही पक्षांचे हजारों लोक मारले गेले, व रक्ताचे पूर वाहिले. शेवटीं रामाच्या हातानें रावण मारला गेला. तेव्हां सर्वांना आनंद झाला.

## सीतेची भेट.

रावणाला मारल्यावर रामाच्या आज्ञेनें

बिभीषण लंकेचें राज्य करूं लागला. सीतेला अशोकवनांतून आणून, मंगलस्नान घालून व उंची वस्त्रें व अलंकार देऊन रामाजवळ नेलें. तिला पाहून त्याच्या अंतःकरणांत प्रेमाचें भरतें आलें. खरोखर सीता निष्कलंक व शुद्ध होती; पण ती पुष्कळ दिवस दुष्ट राक्षसांच्या घरीं राहिल्यामुळें तिला शुद्ध न करतां तशीच घरांत घेतली तर लोक नांवें ठेवितील, म्हणून तिच्या शुद्धतेबद्दल सर्व लोकांची प्रथम खात्री करवून मग तिच्यासह पुष्पक विमानांत बसून राम व लक्ष्मण हे अयोध्येस गेले. जातांना वाटेंत जीं जीं स्थलें लागलीं तीं तीं रामानें सीतेला दाखविलीं, आणि या ठिकाणीं अमुक अमुक गोष्ट घडली, अशी आपल्या वनवासांत घडलेल्या एकेका गोष्टीची तिला आठवण करून दिली. अयोध्या जवळ आली, तसें रामानें हनुमान् यास पुढें आपल्या येण्याची खबर देण्यासाठीं भरताकडे पाठविलें. ती खबर ऐकून भरताला जो आनंद झाला, तो शब्दांनीं वर्णन करून सांगतां येत नाहीं. राम, लक्ष्मण व सीता हीं कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, भरत वगैरे मंडळींला प्रेमानें

भेटली. आपलें राज्य परत घ्यावें म्हणून भरतानें हात जोडून रामाला विनंति केली. रामानें त्याला आलिंगन दिलें आणि वसिष्ठाच्या आज्ञे-वरून भरताचें म्हणणें कबूल केलें. रामास राज्याभिषेक मोठ्या थाटानें झाला आणि असा पराक्रमी, सद्गुणी आणि प्रजेवर पुत्राप्रमाणें प्रेम करणारा राजा मिळाल्यानें अयोध्येचे लोकही सुखी झाले.

---

# ७ उत्तरकांड.

[रामचंद्राच्या चरित्राच्या उत्तरार्धास येथून प्रारंभ झाला म्हणून यास 'उत्तरकांड' असें नांव दिलें आहे.]

## सीतेला रानांत सोडलें.

आई, भाऊ, बायको व मित्र यांच्या सहवासांत आणि प्रजेचें पालन यथायोग्य करण्यांत रामाचे कित्येक दिवस मोठ्या सुखानें गेले. पण पुनः बिचाऱ्या सीतेच्या कपाळीं वाईट दिवस पाहण्याचें आलें! आपल्या राज्यांत प्रजेला सुख मिळतें किंवा नाहीं, त्यांचीं दुःखें काय आहेत, राजाविषयीं प्रजेचें मत कसें काय आहे, राजाचे

अंगीं त्यांना कोणते गुण किंवा दोष दिसतात, ते समजून घेणें आणि त्याप्रमाणें कारभाराचें धोरण ठेवणें हा राजाचा धर्म रामचंद्राला ठाऊक होता. म्हणून आपल्याविषयीं लोक काय बोलतात, तें समजण्याकरितां त्यानें आपले गुप्त हेर चोहोंकडे ठेविले असत. एके दिवशीं एक हेर येऊन रामचंद्रास म्हणाला—" महाराज, सगळे लोक आपल्या गुणांबद्दल आपली वाहवाच करीत आहेत. परंतु एक दोष मात्र आपले ठिकाणीं त्यांना दिसत आहे. सीतादेवी त्या दुष्ट रावणाचे घरीं दहा महिने राहिली असून महाराजांनीं तिला घरांत घेतलें हें चांगलें केलें नाहीं, असें लोक म्हणतात." हें ऐकून रामाला फार दुःख झालें, आणि त्यानें सीतेला रानांत सोडून देण्याचा बेत केला. तिला रथांत बसवून वनांत वाल्मीकि ऋषीच्या आश्रमाचे बाजूस सोडून देण्याचें काम लक्ष्मणाकडे सोपविण्यांत आलें, व त्यानें आज्ञेप्रमाणें सीतेला आश्रमापाशीं नेऊन सोडिलें. लक्ष्मण तिला नमस्कार करून दुःखाचे सुस्कारे टाकीत निघून गेला, व सीता नशिबाला दोष देत मोठ्यानें रडूं लागली. तें

तिचें रडणें ऐकून ऋषिकुमारांनीं वाल्मीकि ऋषीला खबर दिली. तेव्हां वाल्मीकि स्वतः येऊन व प्रेमाचे शब्द बोलून तिचें समाधान करीत तिला आपल्या आश्रमांत घेऊन गेले.

## कुश आणि लव यांचा जन्म.

लोकांच्या निंदेवरून रामानें सीतेला वनांत सोडिलें, तेव्हां ती गरोदर होती. ती वाल्मीकि ऋषीच्या आश्रमांत योग्य कालीं प्रसूत झाली. तिला जे दोन मुलगे झाले, त्यांचीं नांवें वाल्मीकीनें कुश व लव अशीं ठेविलीं. हीं मुलें रूपानें व अंगलटीनें हुबेहुब रामासारखीं होतीं. तशींच तीं बुद्धीनेंही तीव्र होतीं. वाल्मीकीनें त्यांना लिहिण्यावाचण्यास शिकविलें, आणि स्वतः रचिलेल्या रामायणांतले श्लोक त्यांचेकडून पाठ करवून घेतले. हे श्लोक तीं मुलें मधुर आवाजानें म्हणत, तेव्हां ऐकणारे गहिंवरून जात. परंतु आपण रामचंद्राचीं मुलें आहों, आणि आपण जे श्लोक म्हणतों त्यांत आपल्या पित्याच्या चरित्रांतल्या गोष्टी वर्णिल्या आहेत हें त्या मुलांना अद्याप कळलें नव्हतें.

## राम अश्वमेधयज्ञ करतो.

एके दिवशीं वाल्मीकि ऋषि कुश आणि लव यांना पढवीत बसले असतां त्यांना रामचंद्राकडून अश्वमेध यज्ञासाठीं बोलावणें आलें. वाल्मीकि आपल्याबरोबर कुशलवांस घेऊन यज्ञास गेले. येथें ते दोघे रामायणांतले श्लोक म्हणत असतां रामचंद्राचें लक्ष तिकडे गेलें, आणि त्याला त्यांची इतकी गोडी लागली कीं पुनः प्रारंभापासून सगळें रामायण त्यानें त्यांच्याकडून म्हणविलें. तें म्हणत असतां राम आणि हीं दोन मुलें यांच्या रूपांतला व आवाजांतला विलक्षण सारखेपणा लोकांच्या नजरेला आला. पुढें शोध केल्यावर हीं आपलींच मुलें आहेत असें रामचंद्रास कळून त्याला प्रेमाचें भरतें आलें, आणि त्यानें वाल्मीकीकडे सांगून पाठविलें कीं, सीतेचें वनवासांत चांगलें आचरण होतें अशी खात्री तुम्ही देत असाल तर तिला परत घेण्यास आपण तयार आहों. वाल्मीकीनें तें कबूल, केलें आणि भर सभेंत तिला आणून तिच्याविषयीं खात्री दिली. तरी येवढ्यानें रामचंद्राचें समाधान होईना. तो म्हणाला कीं, "सीता आपल्या आचरणाबद्दल

आणखी कांहीं खात्रीलायक पुरावा देईल तर सर्वांना अधिक समाधान वाटेल." तेव्हां सर्वांच्या समक्ष सीता मोठ्यानें पण स्त्रीजातीस योग्य अशा नम्रपणाच्या शब्दांनीं म्हणाली:—"माझ्या हातून शरीरानें, शब्दांनीं किंवा मनानें वाईट कृत्य घडलें नसेल तर ही पृथ्वी मला पोटांत घेवो." याप्रमाणें म्हणतांच तिच्या पायांखालची जमीन दुभंग झाली, आणि सीता तींत गडप झाली.

## योगी येतो.

सीता दिसेनाशी झाली, तेव्हांपासून रामाचें अंतः करण दुःखानें होरपळत राहिलें. त्याला कांहीं काम सुचेना. रात्रंदिवस सीतेची मूर्ति त्याच्या डोळ्यापुढें दिसूं लागली; आणि आपण तिच्याशीं फार निष्ठुरपणानें वागलों या गोष्टीनें त्याचें मन त्याला खाऊं लागलें. एके दिवशीं कोणी एक जटाधारी योगी त्याचेकडे आला, आणि मी बोलत असतां मध्यें कोणीं आड येऊं नये, येईल त्यास मरणाची शिक्षा देईन, अशी अट रामाकडून कबूल करून घेऊन त्याला एकांतांत कांहीं सांगूं लागला. योगी एकांतांत बोलत असतां कोणीं आंत येऊं नये

म्हणून दाराशीं उभें राहण्याचें काम लक्ष्मणाला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो उभा असतां दुर्वासऋषि आले आणि रामाला भेटण्याकरितां आंत जाऊं लागले. लक्ष्मण त्यांना अटकाव करूं लागला. तेव्हां ऋषि संतापले. हें पाहून लक्ष्मण भ्याला, आणि सर्वांचा नाश होण्यापेक्षां आपला एकट्याचा नाश झालेला पुरवला, असें म्हणून दुर्वासऋषि आल्याची खबर रामास देण्याकरितां तो आंत गेला. लक्ष्मणास पाहतांच योगी तत्काळ तेथून चालता झाला.

## लक्ष्मणाचें चरित्र संपलें.

योग्याला दिलेल्या वचनाचा भंग झाला ही गोष्ट रामाच्या मनाला फार लागली, आणि त्याला कारण लक्ष्मण झाला म्हणून लक्ष्मणानें अयोध्या सोडून जावें अशी सल्ला वासिष्ठानें दिली. त्याप्रमाणें लक्ष्मण सर्वांचा निरोप घेऊन निघाला आणि शरयू नदीच्या तीर्थांत त्यानें बुडी मारली. झालें. त्याची हकीकत येथें संपली.

## रामचरित्राचा शेवट.

लक्ष्मणाची ही वार्ता ऐकून रामाला फार वाईट वाटलें. त्यानें भरताला राजपद घेण्या-

विषयीं आग्रह केला; पण तो घेईना. तेव्हां त्यानें लव आणि कुश या दोघांनीं अयोध्येचें राज्य अर्धें अर्धें वाटून दिलें आणि शत्रुघ्न मधुनामक देशावर राज्य करीत होता, तेथून त्याला भेटीसाठीं बोलाविलें. त्याला सगळी हकीकत समजली, तेव्हां त्यानेंही आपल्या दोघां मुलांस आपलें राज्य वांटून दिलें. रामाचे पाठीमागें आपणही जाण्याचा त्यानें विचार केला. अंगदाला किष्किंधेच्या गादीवर बसवून सुग्रीव निघाला. त्याच्याबरोबर बिभीषण, हनुमान् जांबवान् आणि दुसरें शेकडों वानरवीर रामचंद्राच्या दर्शनासाठीं आले. पैकीं बिभीषण, हनुमान् आणि जांबवान् यांना मागें ठेवून श्रीरामचंद्र अखंड सुख भोगण्यासाठीं शरयू तीर्थांत प्रवेश करून आपले बरोबर बाकीच्यांना घेऊन परलोकीं गेले. येथें रामायण आटोपलें.

---

## कोणापासून काय शिकावें ?

मुलांनो, रामायणाची कथा मीं आतांपर्यंत तुम्हांला सांगितली. ती तुम्हीं लक्ष देऊन ऐकली हें फार चांगलें केलें. ही कथा तुम्हीं या कानानें

ऐकून त्या कानानें सोडून द्यावी अशी नाहीं. जें कांहीं आपण ऐकतों किंवा वाचतों तें नीट लक्षांत ठेवावें, त्यावर विचार करावा, व त्याच्या पासून घेण्यासारखा असेल तो बोध घ्यावा. असें केल्यानेंच बऱ्या वाईट गोष्टी आपणांस ओळखतां येतात, आणि शहाणपण येतें. तुम्हीं जी रामायणाचीं कथा ऐकली, तींत राम, लक्ष्मण, सीता, भरत, मारुती (हनुमान्) व रावण अशीं पुष्कळ नांवें आलीं आहेत. त्यांच्या गोष्टी पासून तुम्हांस कांहीं शिकण्यासारखें आहे असें वाटत असेल. नाहीं बरें? प्रत्येकास वाटत असलें पाहिजे यांत संशय नाहीं. पण काय शिकावें तें मात्र तुम्हां सगळ्यांनाच सांगतां येईल असें नाहीं. म्हणून तुम्हां सगळ्यांच्या बऱ्याकरितां कोणापासून काय शिकावयाचें तें मी थोडक्यांत सांगतों. तें लक्षांत ठेवा, आणि ही रामायणाची कथा पुनः पुनः वाचाल, तेव्हां त्या गोष्टीकडे लक्ष द्या, म्हणजे ती तुमचें मनांत पक्की ठसेल. अशा रीतीनें हें पुस्तक वाचलें तर त्या वाचनाचा उपयोग! नाहीं तर नुसतें वाचून काय मिळणार आहे? फार तर मनाची घटकाभर करमणूक होईल.

आपलीकडे त्यापासून काय फायदा व्हावयाचा आहे? म्हणून मी सांगतों तें नीट ध्यानांत धरा.

## राम.

रामायणांत मुख्य पुरुष राम हा आहे आणि याच्याच नांवावरून या ग्रंथाला 'रामायण' म्हणजे रामाची कथा असें म्हणतात. या रामाच्या गोष्टीवरून तुम्हीं काय शिकावयाचें? तर आईबापांना, गुरूंना व वडील माणसांना मान द्यावा; त्यांच्याशीं मर्यादेनें वागावें; ते सांगतील तसें करावें, अभ्यास लक्ष लावून करावा; आपलें शरीर बळकट राहण्याकरितां नेमानें व्यायाम करावा; कोणाशीं उर्मटपणा करूं नये; खरें बोलावें; वडील माणसें सांगत असतील एक आणि आपल्या मनांत करावयाचें असलें दुसरेंच, तर आपली इच्छा बाजूला ठेवून वडील माणसांचें ऐकावें; आपल्या भावंडावर प्रेम करावें; त्यांच्याशीं भांडूं नये; सदासर्वदा आनंदांत रहावें; यांतच खरा धर्म आहे, यांतच पुण्य आहे, यांतच कल्याण आहे.

## लक्ष्मण.

लक्ष्मणापासून शिकावयाचें तें हेंच कीं, आपल्या भावंडावर पूर्ण प्रेम ठेवावें; त्यांच्यासाठीं

संकटें सोसावीं लागलीं तरी तीं सोसण्यास तयार व्हावें; एखादे वेळीं भाऊ रागावला आणि कम जास्त बोलला तरी शांतपणा धरावा; एकदम भांडणावर येऊन डोक्यांत राख घालूं नये; कोणतीही गोष्ट विचारानें करावी; आणि आपल्या भावाला सुख तेंच आपल्याला सुख व त्याचें ऐश्वर्य तेंच आपलें ऐश्वर्य, असें मानून आनंदानें रहावें.

## भरत.

भरत हा तर बंधुप्रीतीचा मूर्तिमंत पुतळा होता. तो रामासाठीं राज्य सोडण्यास सुद्धां तयार झाला होता. याहून अधिक बंधुप्रीति ती कशी असते ?

## सीता.

जशी रामाची कथा रामायणांत मुख्य आहे, तशीच सीतेचीही आहे; आणि सीतेला देवीप्रमाणें समजून लोक मान देतात तो उगीच नाहीं. तिचें आचरणच तसें शुद्ध होतें. राम वनांत जाण्यास निघाला, तेव्हां ती पोरवय होती. तरी पण तेव्हांच तिला माहीत होतें कीं, आपण व पति कांहीं भिन्न नव्हेत. पदार्थ आणि छाया हीं वेगळीं करतां येत नाहींत, त्याप्रमाणें नवरा आणि बायको यांचें असलें पाहिजे; इतकीं

त्यांचीं मनें मिळालीं पाहिजेत; इतकें त्यांचें परस्परांवर प्रेम पाहिजे. हें तिला कळत होतें. म्हणूनच अयोध्येंत जें सुख नाहीं तें सुख तिला रामाबरोबर वनांत दिसलें. दुसरी गोष्ट तिचें शुद्ध वर्तन. रावणानें धरून नेल्यावर तिला मोह पाडण्याकरितां त्यानें पुष्कळ उपाय केले, गोड गोड भाषण केलें, लालूच दाखविली, कोंडून ठेविलें, ठार मारण्याचा सुद्धां धाक घातला. पण ती नीतीपासून ढळली नाहीं. म्हणूनच तिच्या वर्तनाबद्दल ऋषींनींसुद्धां खात्री दिली व ती सर्वांना पूज्य होऊन बसली.

## मारुती अथवा हनुमान्.

आपणां पैकीं पुष्कळांस आपल्या आयुष्यांत कोणाची ना कोणाची तरी चाकरी करण्याचा प्रसंग खास येणार. तेव्हां तसा प्रसंग आलाच तर मारुतीप्रमाणें एकनिष्ठपणें सेवा करण्याचा गुण उचलला पाहिजे. मारुतीनें एकदां रामाची सेवा पत्करल्यावर ती करतांना जिवाकडे पाहिलें नाहीं. मालकाचें हित अगदीं मनापासून करावयाचें, त्यांत आळस किंवा कुचरपणा करावयाचा नाहीं, हा जो सेवकाचा धर्म तो

मारुतीच्या उदाहरणांत उत्तम रीतीनें दिसून येतो. आपापलें कर्तव्य बजावण्यापासून होणारें मनाचें समाधान हेंच सद्गुणाबद्दलचें मोठें बक्षीस असें समजून एकनिष्ठ सेवा करण्याचा गुण मारुतीपासून घ्यावा.

## रावण.

आयुष्यांत काय काय करावें हें कळणें जितकें अवश्य आहे तितकेंच काय काय करूं नये हेंही कळणें अवश्य आहे. यासाठींच रामायणांत रामाचें चरित्र जसें महत्त्वाचें मानिलें आहे, तसेंच पण निराळ्या रीतीनें रावणाचेंही आहे. संपत्ति, ऐश्वर्य व अधिकार प्राप्त झाला तरी मनुष्यानें गर्वानें फुगून जाऊं नये; दुसऱ्याचा अपमान करूं नये; दुसऱ्याच्या वस्तूचा अभिलाष धरूं नये; दुराचारी होऊं नये; गैरसावध राहूं नये; कोणी हिताचा उपदेश करील, तर त्याला तुच्छ मानूं नये; दुसऱ्यानें, विशेषतः आपलें हित चिंतणाऱ्या मित्रानें, किंवा नातलगानें आपल्या अंगचे दोष दाखविले तर त्याचा राग मानूं नये; उलट, आभार मानून ते दोष घालविण्याचा प्रयत्न करावा; अविचारानें एखादी गोष्ट

[illegible] नये; भल्याशी [illegible] आप-
ल्या दुराचरणामुळें स्वतःच्या आणि कुळाच्या नाशास कारण होऊं नये.

सारांश, तुम्ही रामासारखे सुपुत्र, भरत व लक्ष्मण यांच्यासारखे प्रेमळबंधु, व हनुमानासारखे स्वामिनिष्ठ सेवक व्हावें; रावणासारखे उन्मत्त, दुराचारी आणि दुष्ट होऊं नये; मुलींनीं सीतेसारखें पवित्र आचरण ठेवून आणि हरएक गोष्टींत आपल्या पतीच्या उपयोगीं पडून सुखानें संसार करावा. असें केलें म्हणजे रामायण वाचल्याचें, फार तर काय, पण जन्मास आल्याचें सुद्धां सार्थक केल्यासारखें होईल; तसें करण्याची सद्बुद्धी परमेश्वर तुम्हांला देवो आणि दीर्घायु करून सुखांत ठेवो, हेंच मी परमेश्वराजवळ मागतों.

समाप्त.